IPDS योजने अंतर्गत सदर योजनेच्या प्रगतीचे संनियत्रण करण्याकरिता वितरण सुधार समिती (Distribution Reforms Committee) गठित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४५२/ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २७ जानेवारी, २०१७.

संदर्भ : केंद्रीय विद्युत मंत्रालयाचे ज्ञापन क्र. २६/१/२०१४-APDRP दिनांक ३ डिसेंबर, २०१४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने देशातील शहरी भागातील वीज वितरण प्रणालीचे बळकटीकरण करण्यासाठी एकात्मिक ऊर्जा विकास योजना (IPDS) संदर्भिय दिनांक ०३.१२.२०१४ च्या ज्ञापनाव्दारे जाहीर केली आहे.

२. महाराष्ट्र राज्यात महावितरण कंपनीतर्फे व मुंबई शहरात बेस्ट उपक्रमामार्फत सदर योजना राबविण्यात येणार आहे. केंद्र शासनाने महावितरण कंपनीमार्फत राबविण्यात येणाऱ्या रुपये २३००.४३ कोटी इतक्या रक्कमेच्या प्रकल्प खर्चास मंजुरी दिली आहे. तसेच बेस्ट मार्फत राबविण्यात येणाऱ्या रुपये १०४.६५ कोटी इतक्या रक्कमेच्या प्रकल्प खर्चास मंजुरी दिली आहे.

३. एकात्मिक ऊर्जा विकास योजने अंतर्गत करावयाचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) हे वितरण सुधार समिती (Distribution Reforms Committee) कडून मंजूर करुन घ्यावयाचे आहेत. त्या अनुषंगाने वितरण सुधार समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**४. शासन निर्णय :-**

राज्यात केंद्र शासनाच्या एकात्मिक ऊर्जा विकास योजनेच्या अंमलबजावणीसाठी वितरण सुधार समिती (DRC) गठित करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात आहे. सदर समितीचे अध्यक्ष व सदस्य खालीलप्रमाणे राहतील.

| | |
|---|---|
| प्रधान सचिव (ऊर्जा) | अध्यक्ष |
| अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण | सदस्य |
| महाव्यवस्थापक, बेस्ट | सदस्य |
| मुख्य अभियंता (नियोजन), बेस्ट | सदस्य |
| संचालक (प्रकल्प), महावितरण | सदस्य |
| पॉवर फायनान्स कॉर्पोरेशनचे प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |

५. सदर समितीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील.

(१) केंद्र पुरस्कृत विद्युत विषयक योजनांचा आढावा घेणे व अंमलबजावणी दरम्यान संनियंत्रण ठेवणे.

(२) केंद्र पुरस्कृत विद्युत विषयक योजनांचे डीपीआर शिफारस करुन केंद्र शासनाकडे मंजुरीसाठी पाठविणे.

(३) केंद्र पुरस्कृत अन्य योजनांमध्ये प्रस्तावित योजनेच्या कामांचे व्दिरुक्तीकरण झालेले नाही याची खात्री करणे.

६. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०१२७१७५०३३०११० असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.01.27 17:48:39 +05'30'

**(भि.य.मंता)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) उर्वरित सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई
७) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८) सर्व मंत्रालयीन विभाग
९) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१०) महाव्यवस्थापक, बेस्ट उपक्रम, बेस्ट भवन, मुंबई
११) पॉवर फायनान्स कॉर्पोरेशन, नवी दिल्ली
१२) पॉवर फायनान्स कॉर्पोरेशन, रिजनल ऑफीस, १५८, मुनलाईट इमारत, महर्षी कर्वे रोड, मुंबई-२०
१३) कक्ष अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) सर्व कार्यासने ( ऊर्जा), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) निवडनस्ती- ऊर्जा-५